**वित्तीय वर्ष २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये विदर्भ गृहनिर्माण मंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या अंशदायी भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाची रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कॅशफ्लो-२०१४/प्र.क्र. ४४ (ब) /गृनिभू**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख : ३१ मार्च, २०१५

संदर्भ -

१) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग, क्रमांकः कॅशफ्लो-२०१४/१४१/प्र.क्र.४०/अर्थसंकल्प-१, दि.०७.०५.२०१४.

२) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग, क्रमांकः कॅशफ्लो-२०१४/प्र.क्र. ४४(ब)/गृनिभू, दि.१३.०१.२०१५.

३) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग, क्रमांकः अंदाज-२०१४/१३६/प्र.क्र.४०/अर्थसंकल्प-१, दि.२३.०३.२०१५.

**शासन निर्णय -**

मागणी क्र.क्यु-१ मुख्यलेखाशिर्ष २०४९- व्याजप्रदाने, ०३ अल्पबचत भविष्य निर्वाह निधी इत्यादीवरील व्याज, १०४ राज्य भविष्य निर्वाह निधी वरील व्याज, इतर संकीर्ण भविष्य निर्वाह निधी (००) (०२) विदर्भ गृहनिर्माण मंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या अंशदायी भविष्य निर्वाह निधीवरील व्याज (२०४९ ०८५१) भारित ४५, व्याज या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता मूळ अर्थसंकल्पीय तरतूद रू.५३,०७,०००/- इतकी होती. या रक्कमेपैकी उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानुसार रु.१७,६९,०००/- इतकी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. आता संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयानुसार रु.५३,०७,०००/- इतकी सुधारीत तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सबब उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये वितरीत केलेली तरतूद वजा करुन वितरणासाठी उपलब्ध असलेली रु.३५,३८,०००/- (रु. पस्तीस लाख अडतीस हजार फक्त) इतकी रक्कम पुस्तकी समायोजनाने म्हाडास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांनी उपलब्ध प्राप्त तरतूदीमधून अत्यंत आवश्यक व अनिवार्य खर्च करावा. तसेच मंजूर अनुदानापेक्षा सदर खर्च जास्त होणार नाही याची खबरदारी घ्यावी.

या बाबीवर होणारा खर्च वरील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून, तो २०१४-१५ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११५३९२८१३०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rohini Ramesh Puralkar

Digitally signed by Rohini Ramesh Puralkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rohini Ramesh Puralkar
Date: 2015.03.31 15:49:34 +05'30'

**( रोहिणी पुरळकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
२. महालेखाकार-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकरी, मुंबई
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
७. अवर सचिव (अर्थसंकल्प), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. निवडनस्ती